जिल्हा व सत्र न्यायालय, रत्नागिरी या न्यायालयाकरीता माळी हे पद मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पदनि-११२३/प्र.क्र.१९६/कार्यासन ११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ मार्च, २०२५.

वाचा :-१. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र: ब (जन)-१०६०/७९/२०२३/१९२८, दि.१७.१०.२०२३.
२. जिल्हा व सत्र न्यायालय, रत्नागिरी यांचे पत्र क्र.प्रशा.ब -४/५५९१/२०२३, दि.२७.०९.२०२३.
३. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र. एचसीटी-१२२२/८३८/प्र.क्र.१४३/कार्या ३, दि.०६/०२/२०२४.
४. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि -२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क, दि. २७.०४.२०२२

**प्रस्तावना:-**

जिल्हा व सत्र न्यायालय, रत्नागिरी या न्यायालयीन इमारतीच्या सभोवती असलेल्या परिसराचे क्षेत्रफळ मोठ्या प्रमाणात आहे. त्या परिसरात तसेच प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश यांच्या बंगल्यासमोरील बगीच्यामध्ये विविध वृक्षे, फुलझाडे, लॉन तयार करण्यात आले आहे. या सर्वांची देखभाल करण्याकरीता जिल्हा व सत्र न्यायालय, रत्नागिरी यांनी संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये विनंती केल्यानुसार त्या कार्यालयासाठी एक माळी पद उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, दि.०६/०२/२०२४ अन्वये राज्यातील न्यायिक अधिकाऱ्यांची २८६३ नियमित पदे तसेच त्यांच्यासाठी सहाय्यभूत कर्मचारीवृंदांची ११०६४ नियमित पदे निर्माण करण्यास व ५८०३ मनुष्यबळांच्या मर्यादेत बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेण्यास, संबंधित न्यायालय सुरु होण्याच्या दिनांकापासून मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या ५८०३ बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या सेवांमधून जिल्हा व सत्र न्यायालय, रत्नागिरी या न्यायालयाकरिता माळी या अर्धकुशल पदाची सेवा घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त नमूद पद हे भरण्यात आलेल्या दिनांकापासून प्रथमत: दि.३१.०८.२०२५ पर्यंत चालू ठेवण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत असून सदर अस्थायी पदाला दि.३१.०८.२०२५ नंतर मुदतवाढ घेणे आवश्यक राहील. सदर पदाची सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेताना संदर्भ क्र. ४ येथील दि. २७.०४.२०२२ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याची दक्षता संबंधित न्यायालयाने घ्यावी.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. जे-१, २०१४, न्यायदान,१०५, दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (२०१४ ०१७२) (दत्तमत) (अनिवार्य)" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र.५४/व्यय ५, दि.२०.०१.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२४१२३७२२३४१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2025.03.24 12:38:42 +05'30'

**(विलास वसंत गायकवाड )**
**विधि सल्लागार- नि- सह सचिव**

**प्रति,**

१. मा. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)

२. सहाय्यक प्रबंधक (निरीक्षण) , मा.उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई (पत्राने)

३. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, रत्नागिरी.

४. महालेखापाल (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.

५. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. रत्नागिरी

६. उप कोषागार अधिकारी, रत्नागिरी.

७. वित्त विभाग, कार्यासन-व्यय-५ / आ.पु.क./सेवा ९, मंत्रालय, मुंबई.

८. कार्यासन-३, २०, २३, व २४, विधि व न्याय विभाग,मंत्रालय, मुंबई.

९. निवडनस्ती.